सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालये यांना लागणाऱ्या औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
शासन निर्णय क्र.वैशिवि-२०२०/प्र.क्र. २२७ /प्रशासन-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०३ नोव्हेंबर, २०२०

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. खरेदी २०१६/प्र.क्र. ८२/भाग-III, उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. २४०/प्रशा-२, दिनांक २६.०७.२०१७
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम , दि. १७.०४.२०१५
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/औखक/प्रशासकीय मान्यता व निधीबाबत/५९११/२०२०, दि. ०१.१०.२०२०

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक २६.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालये

आणि संस्था यांना लागणारी औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळाकडून खरेदी करणे बंधनकारक करण्यात आलेले आहे. सन २०२०-२१ या वित्तीय वर्षाकरीता संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालयांना लागणाऱ्या औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्याबाबतच्या संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांनी सादर केलेल्या रू. १,१३,५९,९३,४९५/- (रूपये एकशे तेरा कोटी एकोणसाठ लाख त्र्याण्णव हजार चारशे पंच्याण्णव फक्त ) इतक्या रकमेच्या प्रस्तावातील खालील तक्त्यात नमूद बाबींसाठी पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाबींचे नाव | एकूण बाबी | एकूण किंमत (रूपये) |
|---|---|---|---|
| १. | Tab Cap | ३०३ | ३,५८,७४,८६९ |
| २. | Injections | २२९ | १२,९०,२६,८७२ |
| ३. | Liq Oral | १२८ | १,१७,५४,१५८ |
| ४. | Antisep & Disinf | ४७ | ३,९७,४७,६५७ |
| ५. | I. V. Fluid | ५१ | २,६२,७६,२०६ |
| ६. | Surgical Dressing | ५९ | ७,५१,७७,९३३ |
| ७. | Surgical Drug | २२५ | १५,१०,२१,४६४ |
| ८. | Surgical Non Drug | १५० | २४,९७,६०,९०८ |
| ९. | Surg Suture & Stapler | ३०१ | १०,४२,१७,३३४ |
| १०. | Diagnostic Kits & Chemicals | ६४४ | २७,३६,६९,७१५ |
| ११. | X- Ray/CT/ MRI/ Films & Materials | ६१ | ३,५२,६८,७०४ |
| १२. | Anticancer | ५५ | ४१,९७,६७५ |
| | एकूण किंमत रूपये | २२५३ | **१,१३,५९,९३,४९५** |

अटी :-

१) सदर औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा संचालनालयाने करावी.

२) सदरहू औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची विर्निदिष्टे व्यापक व सर्वसमावेशक असून त्यानुसार सदर बाबींचा पुरवठा करू शकणारे किमान तीन उत्पादक / पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, याची खातरजमा करण्यात यावी.

३) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र८२/भाग/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६ मध्ये नमूद विहित कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४) सदर खरेदीसाठी प्रस्तावित केलेल्या बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

५) खरेदीविषयक बाबींची द्विरूक्ती (duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

६) हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळाकडून सदर औषधी व तद्नुषंगिक बाबी प्राप्त करून घेण्यासाठी तात्काळ पुढील आवश्यक ती कार्यवाही शासन निर्णय , सार्वजनिक आरोग्य विभाग, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करण्यात यावी.

७) सदर शासन निर्णयातील विवरणपत्रात / तक्त्यात नमूद खरेदीविषयक बाबींबाबत संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी त्यांच्या दि. ०१.१०.२०२० रोजीच्या पत्रासह जोडलेली तपशीलवार माहिती तात्काळ हाफकिन महामंडळास उपलब्ध करून द्यावी.

८) कोणत्याही परिस्थितीत उपलब्ध निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च करण्यात येऊ नये.

९) संबंधित संस्थांनी सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात (२१) सामुग्री व पुरवठा उद्दिष्टांतर्गत औषधे आणि तद्नुषंगिक बाबींच्या खरेदीसाठी संपूर्ण मंजूर निधी तात्काळ हाफकिन महामंडळाकडे वर्ग करावा.

१०) सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात (२१) सामुग्री व पुरवठा उद्दिष्टांतर्गत औषधे आणि तद्नुषंगिक बाबींसाठीच्या खरेदीसाठी नव्याने निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १० येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेप्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी संचालक, वैद्यकीय शिक्षण व

संशोधन, मुंबई व सहसंचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय (खरेदी कक्ष) मुंबई यांची राहील.

३. सदर खरेदी साठी होणारा खर्च सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात (२१) सामुग्री व पुरवठा उद्दिष्टांतर्गत संबंधित संस्थेच्या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम , दि. १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक -७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२०११०३११५२५१७९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Suresh Lohar

Digitally signed by Swati Suresh Lohar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education And Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, serialNumber=ab72b061785ae0359686d1c8a0ddb0f52744a155be1924d6ab3706e1de7e60ec, cn=Swati Suresh Lohar
Date: 2020.11.03 19:50:26 +05'30'

( स्वा. सु. लोहार)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
६. सर्व अधिष्ठाता / अधीक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय
७. निवडनस्ती (प्रशासन -२)